सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान (नियमन) अधिनियम २०२१ अंतर्गत नोंदणीसाठी नोंदणी शुल्कासह अर्ज केलेल्या सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान केंद्र व बँकेच्या जागेची राज्य सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान व सरोगसी मंडळाच्यावतीने तपासणी करून राज्य मंडळास अहवाल सादर करण्यासाठी तज्ञ अधिका-यांची नियुक्ती करणेबाबत...

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः प्रचिनी-२०२३/प्र.क्र.१७६/कु.क

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत

नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१

तारीख: १४ जून, २०२३

**वाचा -**

१) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे यांचे पत्र क्र. राकुकका / पीसीपीएनडीटी/कक्ष-८ड/नस्ती क्र.९४२ / सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान केंद्र व बैंक नोंदणी/केंद्र व बँकेच्या जागेची तपासणीसाठी/राज्य मंडळाच्यावतीने तज्ञ समिती स्थापन करून शासन निर्णय निर्गमीत करणे/१६७४६-७४८ /२३, दिनांका २८/०३/२०२३.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग, महाराष्ट्र शासन अधिसूचना क्रमांक सरोरामंग-२०२२/प्र.क्र.- १६४ / सरोरामंग- २०२२/प्र.क्र.- १६४ / कु.क., दिनांक १३ जून २०२२.

३) राज्य सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान व सरोगसी मंडळाच्या दिनांक १३.१२.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे मंजुर इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान (नियमन) अधिनियम २०२१ ची अधिसूचना दिनांक १८ डिसेंबर २०२१ रोजी व सरोगसी (नियमन) अधिनियम २०२१ ची अधिसूचना दिनांक २५ डिसेंबर २०२१ रोजी विधी व न्याय मंत्रालय, भारत सरकार यांच्याव्दारे भारतीय राजपत्रात प्रसिध्द करण्यात आलेल्या आहेत. तसेच सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान (नियमन) अधिनियम २०२१ व सरोगसी (नियमन) अधिनियम २०२१ च्या अधिसूचना दिनांक २० जानेवारी २०२२ रोजी आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांच्याव्दारे भारतीय राजपत्रात प्रसिध्द करण्यात आलेल्या आहेत.

सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान (नियमन) अधिनियम २०२१ व सरोगसी (नियमन) अधिनियम २०२१ मधील तरतुदीनुसार राज्यामध्ये संदर्भ क्र.२ अन्वये राज्य सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान व सरोगसी

मंडळाची स्थापना करण्यात आलेली आहे. सदर राज्य सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान व सरोगसी मंडळाची प्रथम बैठक मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, महाराष्ट्र राज्य महोदयाच्या अध्यक्षतेखाली दिनांक १३ डिसेंबर २०२२ रोजी मंत्रालय, मुंबई येथे पार पडली.

सदर बैठकीच्या मंजुर इतिवृत्तानुसार सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान (नियमन) अधिनियम २०२१ च्या कलम १६(५) अंतर्गत नोंदणीसाठी अर्ज केलेल्या सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान केंद्र/बँकेस नोंदणी देण्यापूर्वी केंद्र/बँकेच्या जागेची तपासणी राज्य मंडळाने करण्याबाबतची तरतुद असून राज्य मंडळाच्यावतीने केंद्र/बँकेच्या जागेची तपासणी करण्यासाठी तज्ञ अधिका-यांची एक समिती (सहाय्यक संचालक (वैद्यकीय), आरोग्य सेवा, संबंधीत उपसंचालक कार्यालय आणि जिल्हा/महानगरपालिका क्षेत्रातील केंद्र/बँकेची जागा तपासण्यासाठी त्या जिल्हयाच्या जिल्हा शल्य चिकित्सकांनी नामनिर्देशित केलेले एक शासकीय स्त्रीरोग व प्रसूतीशास्त्र तज्ञ व एक शासकीय बालरोग तज्ञ यांची समिती गठीत करावी व सदर समितीस राज्य मंडळाच्यावतीने केंद्र/बँकेच्या जागेची तपासणीसाठी प्राधिकृत करावे असा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार तज्ञ समिती गठीत करण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान (नियमन) अधिनियम २०२१ अंतर्गत नोंदणीसाठी नोंदणी शुल्कासह अर्ज केलेल्या सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान केंद्र व बँकच्या जागेची राज्य सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान व सरोगसी मंडळाच्यावतीने तपासणी करून राज्य मंडळास अहवाल सादर करण्यासाठी पुढीलप्रमाणे तज्ञ समिती गठीत करण्यात येत आहे.

१) सहाय्यक संचालक (वैद्यकीय), आरोग्य सेवा, संबंधीत उपसंचालक कार्यालय.

२) ज्या जिल्हा / महानगरपालिका क्षेत्रातील केंद्र / बँकेची जागा तपासावयाची आहे त्या जिल्हयाच्या जिल्हा शल्य चिकित्सकानी नामनिर्देशित केलेले एक शासकीय स्त्रीरोग व प्रसूतीशास्त्र तज्ञ आणि एक शासकीय बालरोग तज्ञ.

२. बृहन्मुंबई कार्यक्षेत्रासाठी जिल्हा शल्य चिकित्सिक, ठाणे हे शासकीय स्त्रीरोग व प्रसूतीशास्त्र तज्ञ आणि शासकीय बालरोग तज्ञ यांचे नामनिर्देशन करतील.

३. राज्य सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान व सरोगसी मंडळाच्यावतीने सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान केंद्र व बँकेच्या जागेची तपासणी करण्यासाठी उपरोक्तपणे प्राधिकृत करण्यात आलेल्या तज्ञ अधिका-यानी तपासणी केलेले अहवाल राज्य सहाय्यक प्रजनन तंत्रज्ञान व सरोगसी मंडळाच्यावतीने मान्यता देण्यासाठी अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माता-बाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे यांच्याकडे सर्वांच्या स्वाक्षरीसह दर आठवडयाला सादर करावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१४१४५८४७४४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by NANDKUMAR GANPAT ANDALKAR
Date: 2023.06.14 18:37:46 +05'30'
Adobe Reader version: 11.0.23

**(नंदकुमार आंदळकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. अपर मुख्य सचिव/ सचिव-२, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, निर्माण भवन, नवी दिल्ली.
४. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६. संचालक (१) , आरोग्य सेवा ,आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. संचालक (२), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
८. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
९. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे.
१०.जिल्हाधिकारी, (सर्व)
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१२.आयुक्त, महानगरपालिका, (सर्व)
१३. उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
१४. अधिष्ठता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय,(सर्व)
१५. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, (सर्व)
१६. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७. वैद्यकीय आरोग्य अधिकारी, महानगरपालिका (सर्व)
१८. कार्यकारी आरोग्य अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१९. निवड नस्ती (कु.क.)